आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) करीता निधी वितरीत करण्याबाबत.
(केंद्र हिस्सा - २५०५ २९९२)
(राज्य हिस्सा - २५०५ ए १३८)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.०८/कार्यासन ६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २० ऑक्टोबर, २०२१.

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.
२) ग्राम विकास विभागाची नस्ती क्र.प्रआयो-२०२१/प्र.क्र.५५/यो-१०.

**प्रस्तावना :-**

ग्राम विकास विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) या योजनेंअंतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीताचा केंद्र शासनाकडून प्राप्त प्रथम हप्ता केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिस्सा वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २५०५- ग्रामीण रोजगार या मुख्य लेखाशीर्षाखाली केंद्र पुरस्कृत “प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत” अनुसूचित जमाती घटकाकरीता सन २०२१-२२ या वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींमधून केंद्र व राज्य समरुप हिश्याकरीता खालीलप्रमाणे रु. ४१९२.२२५ लाख इतका निधी खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :- (रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र/राज्य हिस्सा | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीय तरतूद | यापूर्वी वितरीत | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) | २५०५ २९९२ केंद्र हिस्सा (६० टक्के) | ३३-अर्थसहाय्य | ९८७६४.०३ | ०.०० | २५१५.३३५० |
| | २५०५ ए १३८ राज्य हिस्सा (४० टक्के) | | ३००००.०० | १९३७४.९२ | १६७६.८९ |
| **एकूण** | | | **१२८७६४.०३** | **१९३७४.९२** | **४१९२.२२५** |

२. उपरोक्त प्रमाणे रु.४१९२.२२५ लाख (अक्षरी रुपये एकेचाळीस कोटी ब्याण्णव लाख बावीस हजार पाचशे फक्त) इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून अप्पर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७२०/सचिव(व्यय), दि.३०.०८.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१३११४६३०३९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2021.10.20 17:21:32 +05'30'

**( रविंद्र दि. औटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग (ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती)
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. सर्व प्रकल्प अधिकारी (ए.आ.वि.प्र.)
९. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. ग्रामविकास विभाग, योजना-१०, मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन अधिकारी, (का. २/१७)
१४. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.